१५ व्या वित्त आयोगाच्या शिफारशीनुसार कार्यवाही करण्यासाठी जिल्हास्तरीय समिती (District Level Committee) गठीत करणेबाबत.

# महाराष्ट्र शासन
## सार्वजनिक आरोग्य विभाग
### शासन निर्णय क्रमांकः पंविआ-५०२१/प्र.क्र.७९/भाग-१/२१/आरोग्य-७

१० वा मजला, गो. ते. रूग्णालय संकूल इमारत,
नवीन मंत्रालय, मुंबई - ४००००१.
दिनांक : २२ नोव्हेंबर, २०२१

**वाचा :-**

१) भारत सरकार, आरोग्य आणि कुटुंब कल्याण मंत्रालय, नवी दिल्ली यांच्या मार्गदर्शक सूचना पत्र क्र. ७(२०)/२०२०-एनएचएम-१, दिनांक ०९.०७.२०२१.
२) भारत सरकार, आरोग्य आणि कुटुंब कल्याण मंत्रालय, नवी दिल्ली यांच्या मार्गदर्शक सूचना पत्र क्र.१५(२)/FC-XV/FCD/२०२०-२५, दिनांक १६.०७.२०२१
३) वित्त विभाग, अर्धशासकीय पत्र क्र. पंविआ २०२१/प्र.क्र.३३/वित्त आयोग कक्ष, दिनांक ०८.१०.२०२१.
४) शासन निर्णय, सार्वजनिक आरोग्य विभाग क्र.पंविआ-५०२१/प्र.क्र.७९/भाग-१/२१/आरोग्य-७, दिनांक १७.११.२०२१.

**प्रस्तावना:-**

केंद्र शासनाने १५ व्या वित्त आयोगातंर्गत राज्यातील आरोग्य व्यवस्था बळकट करण्यासाठी राज्यांना सन २०२१-२२ ते २०२५-२६ या आर्थिक वर्षात निधी अदा करण्यात येणार आहे. सदर निधीच्या विनियोगाकरीता संदर्भ क्र.१ व २ मध्ये केंद्र शासनाने दिलेल्या मार्गदर्शक सूचनानुसार राज्यस्तरीय व जिल्हास्तरीय समित्या गठीत करणे आवश्यक आहे. त्यानुषंगाने संदर्भ क्र.४ येथील शासन निर्णयान्वये राज्यस्तरीय समिती (State Level Committee) गठीत करण्यात आली असून जिल्हास्तरीय समिती (District Level Committee) गठीत करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय :-**

केंद्र शासनाने १५ व्या वित्त आयोगाच्या शिफारशीच्या अंमलबजावणीच्या अनुषंगाने राज्यातील आरोग्य व्यवस्था बळकट करण्यासाठी राज्यांना वितरीत होणाऱ्या निधीच्या विनियोगाबाबत नियोजन व संनियंत्रण करण्याच्या दृष्टीने याद्वारे राज्यातील सर्व जिल्ह्यांकरीता जिल्हास्तरीय समिती (District

Level Committee) गठीत करण्यात येत आहे. सदर जिल्हास्तरीय समितीची रचना पुढील प्रमाणे आहे:-

| **अ.क्र.** | **समिती रचना** | **पदनाम** |
|---|---|---|
| १ | जिल्हाधिकारी | अध्यक्ष |
| २ | मुख्य कार्यकारी अधिकारी, जिल्हा परिषद | सहअध्यक्ष |
| ३ | जिल्ह्यात महानगरपालिका असेल तर त्या महानगरपालिकेचे आयुक्त | सदस्य |
| ४ | जिल्हा आरोग्य अधिकारी | समितीचे निमंत्रक तथा सदस्य-सचिव |
| ५ | **आरोग्य/ पंचायत राज/ नगरविकास विभागाचे जिल्हास्तरीय अधिकारी**<br>जिल्हा शल्यचिकित्सक<br>जिल्हा प्रकल्प अधिकारी (नगरविकास विभाग)<br>अति.मुख्य कार्यकारी अधिकारी/ प्रकल्प संचालक, डी.आर.डी.ए. | सदस्य |
| ६ | **नागरी व ग्रामीण स्थानिक संस्थांच्या तिनही स्तरामधील निवडक प्रतिनिधी**<br>संबंधित जिल्हाधिकारी व मु.का.अ.जि.प. यांनी नामनिर्देशित केलेले | सदस्य |
| ७ | **पंचायत राज/ नागरी स्थानिक संस्थांच्या कामकाजात सुधारणा या क्षेत्रातील तज्ञ**<br>संबंधित जिल्हाधिकारी व मु.का.अ.जि.प. यांनी नामनिर्देशित केलेले | सहयोगी सदस्य |

२. तसेच जिल्हा स्तरीय समितीचे निमंत्रक तथा सदस्य-सचिव हे संबंधित जिल्हा आरोग्य अधिकारी असून त्यांनी याबाबत जिल्हाधिकारी व मुख्य कार्यकारी अधिकारी, जिल्हा परिषद यांच्याशी समन्वय साधून सदर समित्या १५ दिवसांत गठीत करुन त्याबाबतचा अहवाल आयुक्त, आरोग्य सेवा तथा अभियान संचालक, राष्ट्रीय आरोग्य अभियान, मुंबई यांना सादर करावा व त्यांनी एकत्रित अहवाल शासनास सादर करावा.

३. सबंधित जिल्हाधिकारी व मुख्य कार्यकारी अधिकारी, जिल्हा परिषद यांनी नागरी व ग्रामीण स्थानिक संस्थांच्या तीन स्तरामधील निवडक प्रतिनिधी आणि पंचायत राज / नागरी स्थानिक संस्थांच्या कामकाजात सुधारणा या क्षेत्रातील तज्ञ नामनिर्देशित करुन सदर समितीमध्ये त्यांचा अंतर्भाव करण्यात यावा.

४. जिल्हा स्तरीय समिती यांची भूमिका कार्यकक्षा ही केंद्र शासनाच्या संदर्भ क्र.३ व ४ मध्ये नमूद दिनांक ०९.०७.२०२१ व दिनांक १६.०७.२०२१ रोजीच्या मार्गदर्शक सूचनांमध्ये नमूद केल्यानुसार राहील.

५. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०२१११२३११४१५३९७१७ असा आहे. हा शासन निर्णय डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

LAHANE VIJAYKUMAR LAXMANRAO

Digitally signed by LAHANE VIJAYKUMAR LAXMANRAO
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=PLANNING DEPARTMENT, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=047af7706d4845170e3864b62c8bc6b380c78f11ce6607746c0b15e934fc8284, pseudonym=91CF303CCF98AAFBC28FD87C6A71DA717A6A7250, serialNumber=8902AEDC74F3CACF3FB967FF5955AAF5DCBFDD2C053872C04B5E4671EF77EC30, cn=LAHANE VIJAYKUMAR LAXMANRAO
Date: 2021.11.24 13:05:39 +05'30'

**( वि. ल. लहाने )**
**सह सचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रत:-**

१) मा.मंत्री (सार्वजनिक आरोग्य व कुटुंब कल्याण) यांचे खाजगी सचिव.
२) मा.राज्यमंत्री (सार्वजनिक आरोग्य व कुटुंब कल्याण) यांचे खाजगी सचिव.
३) अपर मुख्य सचिव, ग्रामविकास विभाग, मंत्रालय, मुंबई
४) अपर मुख्य सचिव, सार्वजनिक आरोग्य विभाग, मंत्रालय, मुंबई
५) अपर मुख्य सचिव, वित्त विभाग, मंत्रालय, मुंबई
६) अ.मु.स./प्र.स./सचिव, नगरविकास विभाग-२, मंत्रालय, मुंबई
७) प्रधान सचिव, महिला व बालविकास विभाग, मंत्रालय, मुंबई
८) मा.मुख्य सचिव, महाराष्ट्र राज्य यांचे वरिष्ठ स्वीय सहाय्यक, मंत्रालय, मुंबई.
९) आयुक्त आरोग्य सेवा तथा अभियान संचालक, राष्ट्रीय आरोग्य अभियान, मुंबई.
१०) संचालक-१, आरोग्य सेवा, आरोग्य सेवा आयुक्तालय, मुंबई.
११) संचालक-२, आरोग्य सेवा, आरोग्य सेवा आयुक्तालय, पुणे.
१२) अतिरिक्त संचालक, आरोग्य सेवा, राज्य कुटुंब कल्याण कार्यालय, पूणे
१३) अतिरिक्त अभियान संचालक, राष्ट्रीय नागरी आरोग्य अभियान, मुंबई
१४) कार्यकारी संचालक, राज्य आरोग्य यंत्रणा संसाधन केंद्र, पुणे
१५) सहसंचालक (तांत्रिक), राष्ट्रीय आरोग्य अभियान, मुंबई
१६) उपसचिव (वित्त आयोग कक्ष), वित्त विभाग, मंत्रालय, मुंबई
१७) सर्व जिल्हाधिकारी.
१८) सर्व मुख्य कार्यकारी अधिकारी, जिल्हा परिषद.
१९) सर्व जिल्हा शल्यचिकित्सक.
२०) सर्व जिल्हा आरोग्य अधिकारी, जिल्हा परिषद.
२१) निवडनस्ती ( आरोग्य -७) .